**पूर्व द्रुतगती मार्गावरील अमर महल उड्डाणपुलाच्या दुरूस्तीसाठी तातडीच्या व दीर्घकालीन उपाययोजना सुचविण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. समिती-२०१७/प्र.क्र.६३/२०१७/रस्ते-६,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १३.०४.२०१७

**प्रस्तावना**:-

पूर्व द्रुतगती मार्गावरील अमर महल उड्डाणपुलाचे गर्डरचे सांधे नादुरूस्त झाल्यामुळे सदर उड्डाणपुलास धोका निर्माण झाला आहे. उड्डाणपुलाच्या सुरक्षिततेसाठी व भविष्यातील हानी टाळण्याच्या दृष्टीने तातडीच्या व दीर्घकालीन उपाययोजना सुचविण्यासाठी समितीचे गठन करणे व समितीची कार्यकक्षा ठरविणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

पूर्व द्रुतगती मार्गावरील अमर महल उड्डाणपुलाच्या सुरक्षिततेसाठी व भविष्यातील हानी टाळण्याच्या दृष्टीने तातडीच्या व दीर्घकालीन उपाययोजना सुचविण्यासाठी डॉ. रवी सिन्हा, प्राध्यापक, आय.आय.टी- बी., पवई, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येत असून, सदर समितीची रचना व कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १. | डॉ.रवी सिन्हा, प्राध्यापक,आय.आय.टी- बी., पवई, मुंबई | अध्यक्ष |
| २. | श्री.पी.एल.बोंगिरवार, निवृत्त सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ३. | श्री.एस.बी.तामसेकर , निवृत्त सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ४. | डॉ.अभय बांबोले, प्राध्यापक,व्हि.जे.टी.आय.,माटुंगा,मुंबई | सदस्य |
| ५. | श्री.डी.के.कान्हेरे, (सेवानिवृत्त) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ६. | श्री. यु.एस. कलगुटकर, सल्लागार व निवृत्त अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ७. | श्री.व्ही.पी.रामगुडे,अधिक्षक अभियंता तथा सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी,नाशिक | सदस्य |
| ८. | श्री.संजय भोंगे, अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल), कोकण भवन, नवी मुंबई | सदस्य सचिव |

२) **<u>समितीची कार्यकक्षा</u>**-

१) अमर महल उड्डाणपुलाच्या दुरूस्ती/ पुनर्स्थापना व सुरक्षिततेसाठी करावयाच्या तातडीच्या उपाययोजना सुचविणे.

२) सदर पुलाची भविष्यातील हानी टाळण्याच्या दृष्टीने दीर्घकालीन उपाययोजना सुचविणे.

३) **<u>समितीची मुदत</u>**- समितीने आपला अहवाल **दि. ३०.४.२०१७ पर्यंत** शासनास सादर करावा.

४) काही विशिष्ट स्वरुपाच्या कामासाठी समितीवर तज्ञ सदस्यांना निमंत्रित ("Co-opt") करण्याचे अधिकार समितीला राहतील. सदर तज्ञ सदस्यांचा खर्च मुंबई बांधकाम मंडळ,चेंबूर यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

५) समितीस निर्णयास येण्याकरीता आवश्यकता असल्यास काही विशिष्ट स्वरूपाच्या चाचण्या करणे / विशिष्ट प्रकारच्या साधनसामग्रीचा वापर करण्याबाबत समितीस पूर्ण अधिकार राहतील . याकरीता येणारा खर्च मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

६) समितीने केलेल्या शिफारशीनुसार दुरूस्तीच्या उपाययोजना करण्याची कार्यवाही मुख्य अभियंता (वि.प्र.), मुंबई यांनी करावी. तसेच समितीने दिलेल्या सल्ल्यानुसार एखादी कार्यवाही मुख्य अभियंता यांना करणे शक्य नसल्यास अथवा योग्य वाटत नसल्यास सविस्तर कारणांसह आवश्यक त्या आदेशासाठी प्रस्ताव शासनाकडे मंजूरीस सादर करण्यात यावा.

७) समितीमधील अशासकीय अधिकाऱ्यांना मानधन व प्रवास भत्ता म्हणून प्रत्येक बैठकीकरीता रु.१०,०००/-( रूपये दहा हजार फक्त ) एवढी रक्कम देय राहील व सदरचा खर्च मुंबई बांधकाम मंडळ,चेंबूर यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०४१३१७४८१४४८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb818845016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.04.13 17:50:14 +05'30'

**( प्रकाश इंगोले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव(सा.बां.),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) सचिव(बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

४) मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग,मुंबई
५) डॉ.रवी सिन्हा, प्राध्यापक,आय.आय.टी. बी., पवई,मुंबई
६) श्री.पी.एल.बोंगिरवार, निवृत्त सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग {द्वारा मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प), मुंबई }
७) श्री.एस.बी.तामसेकर , निवृत्त सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग विभाग {द्वारा मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प),मुंबई }
८) डॉ.अभय बांबोले, प्राध्यापक, व्हि.जे.टी.आय.माटुंगा,मुंबई
९) श्री.डी.के.कान्हेरे,(सेवानिवृत्त) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम {द्वारा मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प),मुंबई }
१०) श्री.यु.एस कलगुटकर,सल्लागार व निवृत्त अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग {द्वारा मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प),मुंबई }
११) श्री. व्ही.पी.रामगुडे, अधिक्षक अभियंता तथा सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी ,नाशिक
१२) श्री.संजय भोंगे,अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल), कोकण भवन,नवी मुंबई
१३) अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबुर, मुंबई
१४) उप सचिव तथा आंतर वित्तीय सल्लागार,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई
१५) निवड नस्ती (कार्या/रस्ते ६).